**होमगार्ड व नागरी संरक्षण दलासाठी**
**स्वतंत्र खरेदी समितीचे गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक:पीईक्यू-०२१०/१८५०/प्र.क्र.७६१/पोल-४

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २५ जुलै, २०११

**वाचा:-** १) शासन निर्णय गृह विभाग क्र.पीईक्यू-०१२०००/पीसी/सीआर-१५/पोल-४, दिनांक २.५.२००६.

२) शासन शुद्धिपत्रक क्र. क्र.पीईक्यू-०१२०००/पीसी/सीआर-१५/पोल-४, दिनांक १६.१.२००९.

३) शासन निर्णय क्र.एमआयएस-०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक २० मे, २००९.

४) शासन निर्णय क्र.एमआयएस-०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक ३ जून, २००९.

**प्रस्तावना:-** राज्य पोलीस दलातील खरेदीमध्ये सुसुत्रता आणून विहित वेळेत मंजूर अनुदानातून त्या त्या वर्षाची खरेदी पूर्ण करुन घेण्याच्या दृष्टीने दिनांक २० मे, २००९ च्या शासन निर्णयानुसार पोलीस महासंचालकांच्या अधिपत्याखाली राज्य स्तरीय खरेदी समितीचे गठन करण्यात आले असून, दिनांक ३ जून, २००९ च्या शासन निर्णयानुसार खरेदीचे वेळापत्रक विहित करण्यात आलेले आहे. सदर खरेदी धोरणानुसार पोलीस महासंचालकांच्या अधिपत्याखालील खरेदी समितीमार्फत खरेदी प्रक्रियेचा अवलंब करीत असतांना पोलीस विभागाच्या खरेदी करावयाच्या बाबी व न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय तसेच होमगार्ड व नागरी संरक्षण दलाच्या खरेदी करावयाच्या बाबी या समान नसल्याचे निदर्शन आले आहे. राज्य पोलीस दलाची विविध बाबींची मोठ्याप्रमाणात होत असलेल्या खरेदी प्रक्रियेच्या तुलनेत न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय तसेच होमगार्ड व नागरी संरक्षण दलाच्या खरेदीच्या बाबी कमी असून त्यांचे विनिदेश देखील पोलीस विभागापेक्षा वेगळे आहेत. त्यामुळे न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय तसेच होमगार्ड व नागरी संरक्षण दलाच्या खरेदीबाबत पोलीस महासंचालकांच्या अधिपत्याखालील खरेदी समितीला खरेदीच्या अनुषंगाने पुरेसा न्याय मिळू शकत नाही असे दिसून आले आहे. होमगार्ड व नागरी संरक्षण यांच्यासाठी निविदा प्रक्रियेद्वारे खरेदी करावयाच्या बाबींची संख्या व त्यासाठी उपलब्ध होणारा निधी कमी प्रमाणात असल्याने यांची खरेदी प्रक्रिया ही पोलीस विभागाच्या खरेदी प्रक्रियेसोबत होमगार्ड व नागरी संरक्षण दलाची खरेदी पूर्ण होत नाही असे लक्षात आलेले आहे. या सर्व बाबींचा विचार करुन होमगार्ड व नागरी संरक्षण दलासाठी राज्यस्तरावर एक राज्यस्तरीय खरेदी समिती गठित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-** होमगार्ड व नागरी संरक्षण दलासाठी खरेदी करावयाच्या उपकरणे/साधनसामग्रीच्या अनुषंगाने राबविण्यात येणाऱ्या निविदा प्रक्रियेची स्वतंत्रपणे छाननी होऊन अशी निविदा प्रक्रिया पारदर्शक होण्याच्या दृष्टीने संचालक, होमगार्ड व नागरी संरक्षण दल यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे. यासाठीच्या समितीचे गठन संचालक, होमगार्ड व नागरी संरक्षण दल, मुंबई यांच्याकडून दिनांक ३० जुलै, २०११ पर्यंत विहित आदेशाद्वारे करण्यात येईल.

**-: खरेदी समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १) | महासमादेशक होमगार्ड व संचालक नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २) | उप महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ३) | सह/उप सचिव, पोल-४ गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४) | सह/उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५) | सह संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ६) | वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी (चालन व भंडार) संचालक नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

**-: तांत्रिक समिती :-**

| | | |
|---|---|---|
| १) | उप महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २) | समादेशक, न ागरी संरक्षण प्रशिक्षण महाविद्यालय, मुंबई | सदस्य |
| ३) | वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी (चालन व भंडार) संचालक नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. होमगार्ड व नागरी संरक्षण दलासाठी निविदा प्रक्रियेद्वारे खरेदी करावयाच्या बाबींसाठी दिनांक २० मे, २००९ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार व शासन शुद्धिपत्रक दिनांक ६ जुलै, २००९ मध्ये विहित केलेल्या तरतुदी लागू राहतील.

३. शासन शुद्धिपत्रक क्रमांक .एमआयएस-०४०९/५९२/प्र.क्र.२७०/पोल-४, दिनांक ६ जुलै, २००९.मध्ये विहित केल्यानुसार प्रतिनग रु.५ लाखापेक्षा जास्त असलेल्या निविदा प्रक्रियेतील बाबी दिनांक २० मे, २००९ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय खरेदीसमोर मान्यतेसाठी ठेवण्यात येतील.

४. राज्य स्तरीय खरेदी समितीच्या बैठकीत प्रस्तावांची छाननी झाल्यानंतर समितीने मान्य केलेल्या प्रतिनग रु.२५ लाख रक्कमेवरील खरेदीचे प्रस्ताव प्रचलित आदेशानुसार मा.मंत्री गृह यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येतील.

५. पोलीस विभागाच्या खरेदीसाठी दिनांक २० मे, २००९ च्या शासन निर्णयासोबतच्या विहित केलेल्या विवरणपत्रातील माहिती सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार सादर करणे आवश्यक राहील.

६. पोलीस विभागाच्या खरेदीसाठी दिनांक ३ जून, २००९ अन्वये खरेदीसाठी विहित केलेल्या वेळापत्रकानुसार होमगार्ड व नागरी संरक्षण दलासाठी खरेदी प्रक्रिया पूर्ण करण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०७२६१०१२३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गौ.जो.रसाळ)
शासनाचे सह सचिव

प्रति,

महासमादेशक, होमगार्डस व संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

प्रतिलिपी:-

मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर मुख्य सचिव (गृह) मंत्रालय, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (अ व सु) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (उद्योग) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
पोलीस आयुक्त बृहन्मुंबई
अपर पोलीस महासंचालक ( नि व स) महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई
पोलीस महानिरीक्षक सुरक्षा, मुंबई
आयुक्त, उद्योग संचालनालय, मुंबई
संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक मोटार परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
पोलीस उपआयुक्त, मुख्यालय-१ बृहन्मुंबई
सह संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
निवडनस्ती गृह विभाग (पोल-४)